सायली नर्सिंग होम, एनडीए रोड, उत्तमनगर, पुणे
या रुग्णालयास वैद्यकिय खर्च प्रतिपुर्तीसाठी
शासन मान्यता देणेबाबत .

महाराष्ट्र शासन.
शासन निर्णय क्र.एमएजी २००८/प्र. क्र.१४२/आरोग्य -५
सार्वजनिक आरोग्य विभाग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १ जानेवारी , २००९.

वाचा :-

१) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.जीरुखा २०००/प्र.क्र १०१/आरोग्य-३ दि. २६/९/२०००
२) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. एमएजी २००५/९/प्र.क्र१/आरोग्य-३ दि. १९/३/२००५
३) आरोग्य सेवा संचालनालयाचे पत्र क्र.संआसे/खारु/शा.मा/सायली /टे-१/कक्ष-३/२००८ दि.२९/४/२००८ व दि.३०/०६/२००८.

<u>शासन निर्णय</u> :- महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ व त्या अनुषंगाने वेळोवेळी विहीत केलेल्या नियमांनुसार सायली नर्सिंग होम, एनडीए रोड, उत्तमनगर, पुणे या रुग्णालयास,शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना आर्थोपेडीक (सांधेरोपण) शस्त्रक्रिया तथा उपचार करण्यास व त्याप्रित्यर्थ होणाऱ्या वैद्यकिय खर्चाची प्रतीपुर्ती अनुज्ञेय ठरविण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर रुग्णालयाने खालील अटींचे प्रकर्षाने पालन करणे आवश्यक राहील.

१) मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम १९५० मधील कलम ४१ अे नुसार खाजगी रुग्णालयांनी १० % रुग्णांवर मोफत व १० % रुग्णांवर सवलतीच्या दराने उपचार करणे.
२) मुंबई शुश्रुषा गृहे अधिनियम १९४९ अन्वये विहित केलेल्या निकषानुसार प्रशिक्षित वैद्यकिय अधिकारी व कर्मचारी वर्ग उपलब्ध असणे
३) ज्या आजारावर उपचार करण्यासाठी मान्यता देण्यात आली आहे. त्या आजाराचे संशोधन करण्यासाठी तसेच चाचण्यांअंती झालेल्या निदानानुसार शस्त्रक्रिया करण्यासाठी आवश्यक ती यंत्रसामुग्री रुग्णालयामध्ये उपलब्ध असणे
४) शासकीय रुग्णालयात ज्या दराने फी आकारली जाते. त्या दराने फी आकारली जावी.
५) केंद्र शासन , राज्य शासनामार्फत कार्यान्वीत केलेल्या राष्ट्रीय कार्यक्रमाच्या मोहिमेमध्ये सक्रिय सहभाग घेणे आवश्यक आहे.

२. वरीलप्रमाणे मान्यता दिलेल्या आजारांसंबंधीच्या, उपचार व शस्त्रक्रियेकरीता सदर रुग्णालयाने आकारलेल्या वैद्यकीय खर्चाची संपूर्ण प्रतीपुर्ती विहीत नियमानुसार अनुज्ञेय राहील . अतितात्काळ बाब वगळता सदर रुग्णालयातील मान्यताप्राप्त उपचाराखेरीज अन्य कोणत्याही औषधोपचारासाठी शासकीय कर्मचाऱ्यास प्राधिकृत वैद्यकिय अधिकाऱ्यांची पूर्वसंमती घेणे आवश्यक राहील.

३. हा शासन निर्णय मा. मुख्यमंत्री, मा. मंत्री मा. राज्यमंत्री ,मा. सभापती व मा. उपसभापती महाराष्ट्र विधानपरिषद मा.अध्यक्ष व मा. उपाध्यक्ष महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळाचे मा. विरोधी पक्ष नेते ,तसेच महाराष्ट्र विधानसभा/ परिषदेचे विद्यमान सदस्य, माजी सदस्य आणि त्यांच्या कुटुबियांना सुध्दा लागू राहील.

४. सदर शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून लागू होईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(न.ग.तडवी)

कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल, महाराष्ट्र राज्य,यांचे सचिव,राजभवन मुंबई

मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई

मंत्री ( आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

राज्यमंत्री ( आरोग्य) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई

सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव ( सर्व मंत्रालयीन विभाग), मंत्रालय, मुंबई

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई ( पत्राने)

सचिव , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई ( पत्राने)

विभागीय आयुक्त ( सर्व)

जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमी अभिलेख महाराष्ट्र राज्य , पुणे

जिल्हाधिकारी ( सर्व)

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व)

महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व अनुज्ञेयता)/ ( लेखा परिक्षा), मुंबई

महालेखापाल, महाराष्ट्र-२ ( लेखा व अनुज्ञेयता) ( लेखा परिक्षा) नागपूर

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

जिल्हा कोषागार अधिकारी ( सर्व)

संचालक, आरोग्य सेवा, मुंबई

संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन, मुंबई

संचालक, आयुर्वेद, मुंबई

संचालक, राज्य कामगार विमा योजना, मुंबई

व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो- फार्मास्युटीकल कॉर्पोरेशन, परेल , मुंबई

महासंचालक , माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई

सहसंचालक, आरोग्य सेवा ( सर्व)

उपसंचालक, आरोग्य सेवा ( सर्व)

जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, ( सर्व)

जिल्हा शल्यचिकित्सक, ( सर्व)

महाप्रबंधक, मुबई उच्च न्यायालय, मुंबई ( पत्राने)

प्रोथोनोटरी व सिनियर मास्टर, उच्च न्यायालय, मुंबई ( पत्राने)

व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई

सार्वजनिक आरोग्य विभाग, ( सर्व कार्यासने ) मंत्रालय, मुंबई

सर्व मंत्रालयीन विभाग ( आस्थापना ) मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर शासन निर्णय त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणून द्यावा

सायली नर्सिंग होम, एनडीए रोड, उत्तमनगर, पुणे

निवडनस्ती (आ-५)

------